गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन यांना
भाडेतत्त्वावर दिलेल्या क्रॉस मैदानातील
जागेचा भाडेपट्टा रद्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीशामै-२१११/प्र.क्र.६७/पुनर्बांधणी-४/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ डिसेंबर, २०१६.

**वाचा :-**

१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाचा शासन ठराव क्र.सीआरएम-१०७२/१९७८५-सी, दिनाक १७ आक्टोबर, १९७३
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीशामै-२१११/प्र.क्र.६७/ पुनर्बांधणी- ४/ क्रीयुसे-१, दिनांक २१ डिसेंबर, २०१२.

**प्रस्तावना :-**

समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाच्या दिनांक १७.१०.१९७३ च्या शासन निर्णयान्वये क्रॉस मैदानातील होमगार्ड प्रशिक्षण केंद्रालगतचा १५५५६ चौरस वाराचा भूखंड गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन या संस्थेस भाडेपट्टा करारावर वितरीत करण्यात आला होता. सदर भूखंडाच्या भाडे कराराची मुदत दिनांक १६.१०.२००३ रोजी संपुष्टात आलेली आहे. राज्यातील क्रीडा क्षेत्राच्या विकासासाठी निर्णय घेण्याकरिता गठीत सर्वोच्च समिती असलेल्या राज्य क्रीडा विकास समितीच्या दिनांक १४.०९.२००६ रोजी झालेल्या बैठकीत या संस्थेच्या भाडेपट्टा कराराची मुदत दिनांक १६.१०.२००३ रोजी संपलेली असल्याने व शासनाच्या धोरणानुसार सदर जागेचा वापर क्रीडा संकुल उभारणी करण्यासाठी अधिक मुदतवाढ न देता नुतनीकरण करण्यात येवू नये असा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार दिनांक २१.१२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये क्रॉस मैदान येथील गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन या संस्थेस फुटबॉल खेळाच्या विकासासाठी दिलेल्या भूखंडाचा भाडेपट्टा रद्द करण्यात आला. या शासन निर्णयाविरुध्द गोवन्स स्पोर्टस असोसिएशन यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका (एल) क्र.१८८/२०१३ दाखल केली.

गोवन्स स्पोर्टस् असोसिएशनव्दारे मोठया प्रमाणावर आर्थिक गैरव्यवहार झाल्याची बाब नमूद करुन तसेच संस्थेने अनधिकृत बाबी केल्याचे नमूद करुन तालुका क्रीडा संकुल आणि इतर आवश्यक प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यासाठी दि.२१.१२.२०१२ च्या शासन निर्णयान्वये सदर संस्थेस फूटबॉल खेळाच्या विकासासाठी दिलेल्या भूखंडाचा भाडेपट्टा रद्द करण्यात आला. सदर शासन निर्णय निर्गमित करताना आर्थिक गैरव्यवहार व अनधिकृत बाबी संस्थेने केले असल्याचा आरोप संस्थेवर करण्यात आला. तथापि या मुद्यांच्या आधारे उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई यांनी सक्षम प्राधिकारी

बृहन्मुंबई यांच्याकडे मुंबईच्या शासकीय जागा (निष्कासित करणेबाबत ) अधिनियम, १९५५ अंतर्गत केलेला निष्कासनाचा प्रस्ताव दि.६.०६.२०१२ च्या आदेशान्वये सक्षम प्राधिकारी यांनी निकाली काढलेला असल्याची बाब शासनाने विचारात घेतलेली नाही, असा मुद्दा याचिकेमध्ये उपस्थित करण्यात आला आहे. निष्कासनाचा प्रस्ताव निकाली काढला गेला असल्यामुळे व सक्षम प्राधिकाऱ्याच्या आदेशाविरुध्द कोणतेही अपील दाखल केलेले नसल्यामुळे दि.२१.१२.२०१२ च्या शासन निर्णयात संस्थेविरुध्द आरोप नमूद करणे चुकीचे आहे व त्यामुळे सदर शासन निर्णय अवैध ठरतो, असे याचिकाकर्त्याने याचिकेत नमूद केले आहे. त्याचप्रमाणे गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन बरोबर या भूखंडाच्या भाडेकराराची मुदत दि.१६.१०.२००३ रोजी संपुष्टात आलेली असून त्यापुढील कालावधीकरीता भाडेपट्टीची रक्कम निश्चित करण्यात आलेली नाही असा मुद्दा देखिल याचिकेत उपस्थित करण्यात आला आहे. या याचिकेच्या सुनावणी दरम्यान सदर भूखंडाचा भाडेपट्टा रद्द करण्याबाबतची नेमकी कारणमिमांसा देणे आवश्यक असल्याचे निदर्शनास आले. त्याकरीता दि.२१.१२.२०१२ चा शासन निर्णय रद्द करुन सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

या शासन निर्णयान्वये शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक-क्रीशामै-२१११/ प्र.क्र.६७/ पुनर्बांधणी- ४/ क्रीयुसे-१ दि.२१.१२.२०१२ अधिक्रमित करण्यात येत असून सुधारीत निर्णय खालीलप्रमाणे आहे.

२. राज्य शासनाने क्रीडा धोरण, २००१ विचारात घेवून तालुका / जिल्हा / विभागीय क्रीडा संकुलांची स्थापना करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय दिनांक २६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये घेतला. त्यानुसार मुंबईच्या कृती आराखडा अंतर्गत बृहन्मुंबई शहरासाठी १ विभागीय क्रीडा संकुल, २ जिल्हा क्रीडा संकुले (मुंबई शहर व मुंबई उपनगर) तसेच बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या २४ प्रभागांसाठी २४ तालुका क्रीडा संकुले अशा क्रीडा सविधा उभारणे अपेक्षित होते. बृहन्मुंबई शहरातील मोकळया जागा व खेळाची मैदाने यांची अपुरी संख्या तसेच या प्रयोजनासाठी शासकीय जागा उपलब्ध होवू शकत नाही, पर्यायाने या संकुलांची उभारणी अपेक्षेनुसार पूर्ण होवू शकत नाही. ही वस्तुस्थिती शासनाच्या निदर्शनास आली. सबब, खाजगी संस्थांना भाडेपट्टयाने वितरित केलेल्या शासनाच्या ज्या भूखंडांचा मुदत करार संपुष्टात आलेला आहे, त्या भूखंडांच्या भाडेपट्टा कराराचे नुतनीकरण न करता प्राधान्याने त्या ठिकाणी क्रीडा संकुलाची योजना राबविण्याची बाब शासनाने विचारात घेतली. गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन या संस्थेच्या ताब्यातील भूखंड काढून घेतल्यास सदर भूखंडाचा वापर तालुका क्रीडा संकुल उभारण्यासाठी होऊ शकतो. याव्दारे सध्या केवळ असोसिएशनच्या सभासदांना व समाजाच्या मर्यादित घटकांना अनुज्ञेय असणारा या मैदानाचा वापर, मुंबईतील शाळा/महाविद्यालयातील खेळाडू तसेच परिसरातील नागरिकांना करुन देणे शक्य आहे. त्यामुळे सर्वसामान्य नागरिकांना दर्जेदार क्रीडा सुविधा उपलब्ध करण्यासाठी, संस्थेकडून भूखंड परत घेऊन त्यावर शासनामार्फत क्रीडा सुविधा निर्मितीचा प्रस्ताव दीर्घकाळ शासनाच्या विचाराधीन होता.

३. गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन या संस्थेस फुटबॉल या खेळाच्या विकासासाठी दिलेल्या भूखंडाचा भाडेकरार दि.१६.१०.२००३ रोजी संपुष्टात येऊनही अद्यापपर्यंत गोवन्स स्पोर्टस असोसिएशनने या भुखंडाचा वापर केलेला आहे. दरम्यान या भाडेकरारास कोणत्याही कायदेशीर प्रकारे मुदतवाढ देण्यात आलेली नाही. त्यामुळे संस्थेकडून भूखंड परत घेऊन त्यावर शासनामार्फत सर्वसामान्य नागरिकांना दर्जेदार क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी सदर जागेचा प्रत्यक्षात ताबा घेण्याची कार्यवाही उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई यांनी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करून करावी.

४. गोवन्स स्पोर्टस् असोसिएशन या संस्थेकडून भूखंड परत घेण्याचा निर्णय त्या संस्थेने आर्थिक गैरव्यवहार व अनधिकृत बाबी केल्या असल्याच्या आरोपाच्या आधारे घेण्यात आलेला नाही. तथापि, या मुद्यांच्या आधारे संस्थेवर कारवाई करण्याची बाब शासन स्वतंत्रपणे विचारात घेऊ शकेल.

५. क्रॉस मैदानातील होमगार्ड प्रशिक्षण केंद्रालगतचा १५५५६ चौरस वाराच्या भुखंडाचा ताबा प्रत्यक्ष हस्तांतरीत करेपर्यंत गोवन्स स्पोर्टस असोसिएशनकडून दि.१६.१०.२००३ रोजी संपुष्टात आलेल्या करारात निश्चित केलेले भाडे वसूल करण्यात यावे.उपरोक्त जागेचा प्रत्यक्षात ताबा प्राप्त झाल्यावर तालुका क्रीडा संकुल आणि इतर आवश्यक प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१४११५७१९२१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhary

Digitally signed by Charushila Devendra Chaudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Charushila Devendra Chaudhary
Date: 2016.12.14 12:01:09 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
४. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
५. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत),
६. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
७. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. निवड नस्ती (क्रीयुसे-१)